**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी-१७१७/ प्र.क्र.१०५/ राऊशु-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि. २०.०१.२०१४.
२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टिआरएन-२०१७/ प्र.क्र.३८/सीपीटीपी-अ, दि.१९.०७.२०१७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तीय सुधारणा, दि.२०.०२.२०१६.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/ आ.पु.क., दि.२७.०१.२०१७.

राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपअधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट ब) या संवर्गामध्ये दोन उमेदवारांची शिफारस केली आहे. सदर उमेदवारांचे वनामती, नागपूर या संस्थेमध्ये दि. ०१.०८.२०१७ पासून सामान्य प्रशासन विभागामार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण-४ सुरु करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे गतवर्षी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (२०१६) च्या प्रशिक्षणास रूजू होण्यास मुदतवाढ दिलेले उप अधीक्षक (गट-ब) संवर्गातील १ आणि सहाय्यक आयुक्त (गट-ब) या संवर्गातील १ उमेदवारांचे सुद्धा वनामती, नागपूर या संस्थेमध्ये ०१.०८.२०१७ पासून सामान्य प्रशासन विभागामार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण-४ सुरु करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने राज्य उत्पादन शुल्क विभागातील उपरोक्त नमूद पदांवरील उमेदवारांचे प्रशिक्षण पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी (दोन वर्ष) अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या त्याचप्रमाणे गतवर्षी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (२०१६) च्या प्रशिक्षणास रूजू होण्यास मुदतवाढ दिलेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील उमेदवारांच्या प्रशिक्षणाकरीता उपअधीक्षक, राउशु (गट-ब) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४४००/-) या संवर्गातील तीन व सहायक आयुक्त, राउशु, (गट-ब) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४४००/-) या संवर्गातील एक याप्रमाणे एकूण चार अधिसंख्य पदे दि. ०१.०८.२०१७ पासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रत्यक्ष उपस्थित उमेदवारांच्या संख्येनुसार वेतनापोटी अग्रिम निधी प्रशिक्षण संस्थेला उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार करावी. तसेच व्यावसायिक खातेनिहाय प्रशिक्षण कालावधीत सदर निधी संबंधित उमेदवाराला अदा करण्याची अन्य व्यवस्था देखील त्यांनी करावी.

५. संबंधित अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च टाकून तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६ वित्त विभागाने संदर्भाधीन दि.२०.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०८०८१६३१३२९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9aa522e32450ec03b47343bc963097b0e134f043fb205f2e97595f145aaf4d73, cn=Shivaji Baburao Chavan
Date: 2017.08.08 16:22:26 +05'30'

**( शिवाजी बा. चव्हाण )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
८. कार्यासन क्र. व्यय-८ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
१०. कक्ष अधिकारी (सीपीटीपी कार्यासन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती.